महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई व वाई या कार्यालयांचे प्रलंबित वस्तु व सेवा कर तसेच सन २०२४-२५ वर्षातील कार्यालयीन भाडे अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२१/प्र.क्र.२६/भाषा-१,**
नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०६ ऑगस्ट, २०२४

**वाचा:-**

(१) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. सासंम-२००६/प्र.क्र.८१/सां.का-२, दि. २८ डिसेंबर २००६

(२) मराठी भाषा विभाग, कार्यालयीन आदेश क्र विनिमं २०१६/प्र.क्र.८८/भाषा-१, दिनांक २२ नोव्हेंबर २०१६

(३) दि.०१.०१.२०२४ रोजीचे महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई व पु.ल.देशपांडे, महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांच्यातील भाडे करारपत्र

(४) दि.०३.०४.२०२४ रोजीचे सचिव, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई व सहायक सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ यांच्यातील भाडेकरारपत्र

(५) सचिव, म. रा .म. वि. नि. मं. मुंबई, यांचे पत्र क्र. जा. क्र. विनिमं-२०२४/प्र.क्र. २०/ आस्था/ मुंइभा/ ४४०, दि.१६ एप्रिल २०२४.

**प्रस्तावना**

मराठी भाषा विभागाच्या अधिनस्त असलेल्या महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाच्या कार्यालयासाठी मुंबई येथे शासकीय जागा उपलब्ध नसल्याने तत्कालीन परिस्थितीत संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक- सासंमं २००६/प्र.क्र.८२/सां.का -२, दिनांक २८ डिसेंबर, २००६ अन्वये मंडळ, मुंबई या कार्यालयासाठी पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, प्रभादेवी, मुंबई येथील रवींद्र नाटय मंदिराच्या इमारतीत दुसऱ्या मजल्यावर जागा उपलब्ध करून देण्यात आली आहे. तसेच मंडळाचे वाई येथील कार्यालय प्राज्ञपाठशाळा मंडळाच्या जागेत कार्यरत आहे

प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे, महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई व सचिव महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई यांच्या मध्ये दि. १ जानेवारी, २०२४ रोजी भाडे करार करण्यात आला आहे. सदर करारानुसार महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई यांच्याकडून प्रतिमाह रु. १,०३,४४४/- (१८ टक्के वस्तू व सेवा करासह) असे याप्रमाणे भाडे पु.ल.देशपांडे अकादमी, प्रभादेवी, मुंबई यांना अदा करण्यात येते. तसेच सचिव, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई व सहायक सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ यांच्या मध्ये दि. ०३ एप्रिल, २०२४ रोजी भाडे करार करण्यात आला आहे. सदर करारानुसार महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, वाई यांच्याकडून प्रतिमाह रु. ९७,६३३/- (१८ टक्के वस्तू व सेवा करासह) याप्रमाणे भाडे प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांना अदा करण्यात येते.

सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई यांनी दि.१६.०१.२०२४ च्या पत्रान्वये वाई व मुंबई कार्यालयांचे प्रलंबित इमारत भाडे व वस्तू व सेवा कर अदा करण्याकरिता प्रशासकीय मान्यता देणे तसेच चालू आर्थिक वर्ष सन २०२४-२५ मधील भाडे अदा करण्याकरिता रु. ४९,५३,९०४/- इतका निधी उपलब्ध करुन देण्याबाबत सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सदर शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ कार्यालय यांना मुंबई व वाई येथील कार्यालयांचे प्रलंबित भाडे आणि वस्तू व सेवा कर अदा करण्याकरिता प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

तसेच सदर कार्यालयांचे प्रलंबित भाडे आणि वस्तू व सेवा कर अदा करण्याकरिता तसेच चालू आर्थिक वर्षातील भाडे अदा करण्याकरिता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये लेखाशीर्ष २२०५ ३१८१ - मराठी विश्वकोष निर्मिती मंडळ अंतर्गत-१४ भाडे, पट्टी व कर या उद्दिष्टासाठी अर्थसंकल्पीत तरतूदीपैकी वितरीत लेखानुदानाच्या मर्यादेत उर्वरित निधी रु. १२.६१ लक्ष इतका निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई यांनी पु. ल. देशपांडे अकादमी, प्रभादेवी, मुंबई यांना कार्यालयीन भाडे देयकाची अदायगी करताना वस्तू व सेवा करासह भाडे अदा करण्याची दक्षता घ्यावी.

सदर खर्च मागणी क्रमांक झेडएफ २, मुख्य लेखाशीर्ष २२०५- कला व संस्कृती, ००,१०२-कला व संस्कृती प्रचालन (०१) (०१) (०१) मराठी विश्वकोष निर्मिती मंडळ (अनिवार्य) (२२०५ ३१८१) लेखाशीर्षाअंतर्गत १४-भाडेपट्टी व कर या तपशीलवार शीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये लेखाशीर्ष मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ (अनिवार्य) (२२०५ ३१८१) लेखाशीर्षाअंतर्गत १४- भाडेपट्टी व कर या तपशीलवार शीर्षाखाली अर्थसंकल्पित असलेला निधी आहरित व संवितरीत करण्यासाठी मुंबई येथील कार्यालयांकरिता सहायक लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी आणि सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच वाई येथील कार्यालयाकरिता सहायक सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ यांना आहरण व संवितरण अधिकारी आणि सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३६३/व्यय-४, दि.२९.०५.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८०६१५२६०४४८३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MARUTI LAXMAN LHAYAKAR

Digitally signed by MARUTI LAXMAN LHAYAKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT, 2.5.4.20=8b602cc35713bc737e58d3d44ef592bf297a5d88ada3a0b76b51280ec6081313, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=48E018A56D88390B5D52CAF1AC6184FB1588E15FEBCF18C68DECE92BF667529B, cn=MARUTI LAXMAN LHAYAKAR
Date: 2024.08.06 15:40:27 +05'30'

**( मा. ल.ल्हायकर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल भवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (मराठी भाषा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्ष नेता विधानपरिषद/ विधानसभा, विधान भवन, मुंबई.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
६. महालेखापाल, महाराष्ट्र- १ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर.
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर.
८. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई.
९. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई.

१०. प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय मुंबई.
१२.अपर मुख्य  सचिव, मराठी भाषा विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१५. सर्व अवर सचिव/ कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, मुंबई
१७. निवड नस्ती (भाषा-१)